कोल्हापूर विमानतळासाठी केलेल्या भूसंपादनापोटी ३ % आस्थापना खर्चाची रक्कम उपविभागीय अधिकारी, करवीर, कोल्हापूर कार्यालयास उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.मविवि-१२१८/४/प्र.क्र.१५२/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. १३ फेब्रुवारी, २०१९

वाचा : १.शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एलक्यूएन-४३७५-ए-२, दि.१३.१२.१९७५
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एव्हीएन-१०९६ (१२०/९६)/२८-अ, दि.१६.०६.१९९७
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एमएडीसी-२०१२/प्र.क्र.३५४/२८-अ, दि.२१.०८.२०१३
४. महाव्यवस्थापक (भूसंपादन), मऔविम, मुंबई यांचे पत्र क्र.मऔविम/व्य.(भूसंपादन-१) /ई-३२०८९, दि.१६.०३.२०१७
५. उपविभागीय अधिकारी, करवीर विभाग, कोल्हापूर यांचे पत्र क्र. भूसं/ वशी/ ४७/ २०१९, दि.२८.०१.२०१९

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासन व भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांचेमध्ये झालेल्या करारानुसार शासन निर्णय दि.१६.०६.१९९७ अन्वये कोल्हापूर विमानतळ धावपट्टी विकास व व्यवस्थापन करण्यासाठी १ फेब्रुवारी १९९७ पासून १५ वर्षांच्या लीजवर देखभाल व दुरुस्तीसाठी महाराष्ट्र शासनाकडे हस्तांतर करण्यात आले आहे. यानुसार, सदर विमानतळाचा ताबा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे (MIDC) देण्यात आला. MIDC ने आद्योगिक विकासाच्या दृष्टीकोनातून विमान सेवा उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने कोल्हापूर येथील धावपट्टी विस्तारीकरणासाठी मौजे उजळाईवाडी, सरनोबतवाडी, गोकुळ शिरगाव, मुडशिंग व तामगाव येथील २१८.४६.१ हे.आर. खाजगी क्षेत्र म.औ.वि. अधिनियम १९६१ चे प्रकरण ६ नुसार अधिसूचित केले. तसेच, सरकारी १६.५१ हे.आर. क्षेत्रास म.औ.वि. अधिनियम १९६१ चे कलम २ खंड (ग) च्या तरतुदी लागू केल्या आहेत. तद्नंतर, जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी संपादित खाजगी क्षेत्र २२५.१०.१० हे.आर. या क्षेत्रातील खातेदारांशी वाटाघाटी करुन मोबदल्याच्या दराबाबत निश्चिती केली.

तत्कालीन मा.मुख्यमंत्री यांनी दि.५.०३.२०१० रोजी झालेल्या बैठकीत जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी सुमारे २२३.१६ हे.आर. भूसंपादनासाठी निश्चित केलेले एकूण रु.८०.०० कोटी मूल्य एक महिन्याच्या आत वाटप करण्याचे निर्देश MIDC ला दिले व याचा परतावा राज्य शासनामार्फत पुढील चार वर्षात करण्याचेही निर्देश देण्यात आले. यानुसार, MIDC ने त्यांच्या दि.१०.०६.२०१० रोजी झालेल्या संचालक मंडळाच्या बैठकीत ठराव पारीत करून

भूसंपादनासाठी येणारा रु.८०.०० कोटी निधी उपलब्ध करुन दिला. MIDC ने केलेल्या रु.८०.०० कोटी खर्चाची प्रतिपूर्ती राज्य शासनामार्फत टप्प्याटप्प्याने करण्यात आली.

उपरोक्तप्रमाणे संपादित करण्यात आलेल्या सुमारे २२३.१६ हे.आर. जमीनीचा ताबा उपविभागीय अधिकारी, करवीर यांनी दि.२७.०१.२०११ रोजी MIDC ला सुपूर्द केला. यानंतर, सामान्य प्रशासन विभागाने दि.२१.०८.२०१३ च्या आदेशानुसार कोल्हापूर विमानतळाचा ताबा MIDC ने संपादित केलेल्या जमिनीसह पुनश्च भारतीय विमानपत्तन प्राधिकरणास दिलेला आहे.

कोल्हापूर विमानतळासाठी करण्यात आलेल्या सुमारे २२३.१६ हे.आर. जमीनीच्या संपादनासाठी शासन निर्णय दि.१३.१२.१९७५ अन्वये ३ टक्के प्रमाणे रु.२,४२,२०,५३४/- इतक्या आस्थापना खर्चाची मागणी उपविभागीय अधिकारी, कोल्हापूर यांनी MIDC कडे केली आहे. तथापि, सदरहू भूसंपादन औद्यागिक क्षेत्र विकासासाठी करण्यात आलेले नसून विमानतळ विकासासाठी करण्यात आलेले असल्याने तसेच भूसंपादनासाठी निधी शासनामार्फत उपलब्ध करुन देण्यात आला असल्याने रु.२,४२,२०,५३४/- इतक्या आस्थापना खर्चाची पूर्तता शासनामार्फत करण्यात यावी, असे MIDC ने शासनास प्रस्तावित केले आहे. यानंतर, उपविभागीय अधिकारी, करवीर विभाग यांनी आस्थापना खर्चाच्या नेमक्या रकमेबाबत शहानिशा केली असून त्यानुसार रु.२,४०,००,०००/- एवढी रक्कम आस्थापना खर्च म्हणून उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

कोल्हापूर येथील विमानतळाच्या धावपट्टी विस्तारीकरणासाठी करण्यात आलेल्या सुमारे २२३.१६ हे.आर. जमीनीच्या संपादनापोटी भूसंपादन रकमेच्या ३ टक्के प्रमाणे आस्थापना खर्च उपविभागीय अधिकारी, करवीर विभाग, कोल्हापूर यांना उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे. तसेच, आस्थापना खर्चाबाबत **रु.२,४०,००,०००/- (रु.दोन कोटी चाळीस लक्ष फक्त)** इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबतचा होणारा खर्च मागणी क्रमांक एन-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, राज्य योजना (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित

करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्तप्रमाणे झालेल्या खर्चाचा अहवाल व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास तसेच महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावे.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ४९१/२०१८/व्यय-४, दि.१५.१२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१९०२१५१२१३५८२८०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandhya Ashok Bageshwar

Digitally signed by Sandhya Ashok Bageshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d4a8d57e69da6499480bc974f18dca56ad5541c4795df9434c3e826318ec8ea, serialNumber=ba5a637883d7b445558182d1fd79c7e47a2d65e5094f71fb0ec8c5d23b0cc880, cn=Sandhya Ashok Bageshwar
Date: 2019.02.15 12:19:27 +05'30'

**(सं.अ.बागेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यपाल यांचे परिसहायक, राजभवन, मुंबई.
३. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
५. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
६. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ महाराष्ट्र मर्या., मुंबई
८. जिल्हाधिकारी, कोल्हापूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. उपविभागीय अधिकारी, करवीर, कोल्हापूर
१२. उपसचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपसचिव (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. उपसचिव (उद्योग-१४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती.